आदिवासी क्षेत्र उपयोजनांतर्गत /क्षेत्राबाहेरील उपयोजना सन २०१५-१६ राज्यस्तरीय योजनांचे अर्थसंकल्पित तरतूदी वितरीत करणेबाबत. (अनुसूचित क्षेत्रांमधील ग्रामपंचायतींना आदिवासी उपयोजनेंतर्गत ५ टक्के निधी थेट अनुदान)

**महाराष्ट्र शासन**

**आदिवासी विकास विभाग**

**शासन निर्णय क्र.बीयुडी-२०१५/प्र.क्र.२६/कार्यासन.६**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : २९ ऑगस्ट, २०१५.

संदर्भ : १) वि.वि, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.८२/अर्थ-३, दि.३०.३.२०१५.

२) शासन निर्णय क्रमांक बियुडी २०१५ /प्र.क्र.१/का.६, दि. ७.०४.२०१५.

३) वि.वि., शासन परिपत्रक क्र.अर्थसं २०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७.४.२०१५.

४) वि.वि., शासन परिपत्रक क्र.संकीर्ण २०१५/प्र.क्र.३४/कोषा.प्रशा.५, दि.२४.७.२०१५.

५) आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र.आविवि-२०१५/प्र.क्र.१९/का-१७ दि.२१/०४/२०१५

६) आदिवासी विकास विभाग शासन ज्ञापन क्र.बीयुडी-२०१५/प्र.क्र.१६८/का-६ दि.२८/०८/२०१५

**शासन निर्णय :-**

मागणी क्र.टी-५,मुख्य लेखाशिर्ष : २५०१, विशेष ग्रामविकास कार्यक्रम-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-०१, एकात्मिकृत ग्रामविकास कार्यक्रम, ७९६ राज्य योजनांतर्गत योजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना- (०१) (१०) अनुसूचित क्षेत्रांमधील ग्रामपंचायतींना आदिवासी उपयोजनेंतर्गत ५ टक्के निधी थेट अनुदान (२५०१ २९७१) ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर) याखाली सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात रू.२५८५०.०० लक्ष निधी पूरक मागणीव्दारे अर्थसंकल्पीत केला असून संदर्भ क्र.६ नुसार नियंत्रक अधिकाऱ्यांना उपलब्ध करण्यात आलेला आहे. हा निधी अनुसूचित क्षेत्रांमधील ग्रामपंचायतींना शासनस्तरावरून वर्ग करण्याचा संदर्भ क्र.५ नुसार निर्णय घेतला असल्याने उपसचिव आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी व लेखाअधिकारी,रोख शाखा, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

२. या लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पीत निधीपैकी ७० टक्क्यांच्या मर्यादेत **रू.१८०९५.०० लक्ष (रू.एकशेऐंशी कोटी पंच्यान्नव लक्ष फक्त ) नियंत्रक अधिकारी यांना खर्चासाठी वितरीत करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.**

३. उपरोक्त निधी अर्थसंकल्पीय वितरणप्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. नियंत्रण अधिकारी/विभाग प्रमुख यांनी खर्चासंबधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी .तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उप लेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती ,निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र, सबंधित नियंत्रण अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक, यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत न चुकता पाठवावी.

४. आदिवासी उपयोजनेंतर्गत केलेली तरतूद आदिवासी क्षेत्राबाहेर किंवा सर्वसाधारण योजनेखाली खर्च करण्यात येवू नये. जर आदिवासी उपयोजनेची तरतूद आदिवासी क्षेत्राबाहेर खर्च झालेली आढळल्यास याबाबत सबंधित नियंत्रण अधिकारी यांचेवर जबाबदारी निश्चीत करण्यात येउन शिस्तभंगाची कार्यवाही करण्यात येईल.

५. उपरोक्त आदेश वित्त विभागाच्या अनौ संदर्भ क्र.२४२ /व्यय १४ दि.१७/०८/२०१५ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे .

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८२९१२४३३६५७२४ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Bhagwan Maruti Sawant

Digitally signed by Bhagwan Maruti Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Bhagwan Maruti Sawant
Date: 2015.08.29 12:47:45 +05'30'

**( भगवान सावंत )**

कार्यासन अधिकारी

**प्रति,**

१) महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.

२) वित्त विभाग (अर्थसंकल्प-१९/व्यय १४), मंत्रालय, मुंबई-३२

३) आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.

४) मुख्य कार्यकारी अधिकारी,सर्व जिल्हा परिषद

५) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई

६) कार्यासन अधिकारी (का.क्र.२/१७), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

७) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.

८) निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग.